**संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व त्यांच्या अधिपत्याखालील शासकीय कार्यालये/ महाविद्यालये/संस्थामधील अस्थायी पदांना दि.३१/१०/२०२४ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र. मुवाढ-२०२१/प्र.क्र.१९२/मशि-१,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ मार्च, २०२४.

**संदर्भ :-**
१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शासन निर्णय क्र.मुवाढ-२०२१/प्र.क्र.१९२/मशि-१, दि.०५/०९/२०२३.
२) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क्र., दि.२१/०२/२०२४.
३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. उशिसं/२०२४/अस्थायी पदे/ प्रशा-२, दिनांक २७/०२/२०२४

**प्रस्तावना** :-

संदर्भाधिन क्र.१) येथील दिनांक ०५/०९/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये, उच्च शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील १६५६ पूर्णवेळ व ०६ अर्धवेळ अस्थायी पदे दिनांक ०१/०९/२०२३ ते दिनांक २९/०२/२०२४ पर्यत चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आली आहे. संदर्भाधिन क्र.२ येथील वित्त विभागाच्या दिनांक २१/०२/२०२४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतिबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्याचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२४ ते दिनांक ३१/१०/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधिन क्र. ३) येथील दिनांक २७/०२/२०२४ रोजीच्या पत्रान्वये उच्च शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील १६५६ पूर्णवेळ व ०६ अर्धवेळ अस्थायी पदे दिनांक ०१/०३/२०२४ ते दिनांक ३१/१०/२०२४ पर्यंत चालू ठेवण्यासाठी मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार सदर अस्थायी पदे दिनांक ०१/०३/२०२४ ते दिनांक ३१/१०/२०२४ पर्यंत चालू ठेवण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधिन क्र.३) येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार, उच्च शिक्षण संचालनालय व अधिनस्त असलेल्या शासकीय कार्यालये/शासकीय महाविद्यालये/शासकीय संस्था/शासकीय अध्यापक महाविद्यालये/शासकीय आर्थिकदृष्ट्या मागासवर्गीय वसतीगृहे/भारतीय प्रशासकीय सेवापूर्व प्रशिक्षण केंद्रे/ सावित्रीदेवी फुले महिला छात्रालय, तेलंग स्मारक मुलींचे वसतीगृह/ शासकीय महाविद्यालये वसतीगृहे/ डॉ.बाबासाहेब आंबेडकर, महात्मा ज्योतीराव फुले व राजर्षी शाहू महाराज चरित्र प्रकाशन समिती मुंबई यामधील खालील दर्शविलेली एकूण १६५६ पूर्णवेळ व ६ अर्धवेळ अस्थायी पदे दिनांक ०१/०३/२०२४ ते दिनांक ३१/१०/२०२४ पर्यंत चालू ठेवण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | विभागाचे नांव | एकूण पदे | |
|---|---|---|---|
| | | पूर्णवेळ | अर्धवेळ |
| १ | संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे | ७७ | ० |
| २. | सहसंचालक, उच्च शिक्षण पुणे विभाग, पुणे. | ४६ | ० |
| ३. | सहसंचालक, उच्च शिक्षण मुंबई विभाग, मुंबई. | ५१४ | ६ |
| ४. | सहसंचालक, उच्च शिक्षण कोकण विभाग, पनवेल. | ६३ | ० |
| ५. | सहसंचालक, उच्च शिक्षण कोल्हापूर विभाग, कोल्हापूर. | १०५ | ० |
| ६. | सहसंचालक, उच्च शिक्षण सोलापूर विभाग, सोलापूर. | २९ | ० |
| ७. | सहसंचालक, उच्च शिक्षण जळगांव विभाग, जळगांव. | ३७ | ० |
| ८. | सहसंचालक, उच्च शिक्षण औरंगाबाद विभाग, औरंगाबाद. | २४० | ० |
| ९. | सहसंचालक, उच्च शिक्षण नांदेड विभाग, नांदेड. | ७२ | ० |
| १०. | सहसंचालक, उच्च शिक्षण नागपूर विभाग, नागपूर. | २३२ | ० |
| ११. | सहसंचालक, उच्च शिक्षण अमरावती विभाग, अमरावती. | २४१ | ० |
| | एकूण | १६५६ | ६ |

२. वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन व्यपगत झालेल्या कोणत्याही अस्थायी पदांना मुदतवाढ दिली जाणार नाही, याची दक्षता संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी घ्यावी.

३. उच्च शिक्षण संचालनालय व अधिनस्त असलेल्या शासकीय कार्यालये/शासकीय महाविद्यालये/शासकीय संस्था/शासकीय अध्यापक महाविद्यालये/शासकीय आर्थिकदृष्ट्या मागासवर्गीय वसतीगृहे/भारतीय प्रशासकीय सेवापूर्व प्रशिक्षण केंद्रे/ सावित्रीदेवी फुले महिला छात्रालय, तेलंग स्मारक मुलींचे वसतीगृह/ शासकीय महाविद्यालये वसतीगृहे यामधील अस्थायी पदांवर होणारा खर्च २२०२- सर्वसाधारण शिक्षण या प्रधान लेखाशिर्षाखाली तसेच डॉ.बाबासाहेब आंबेडकर, महात्मा ज्योतीराव फुले व राजर्षी शाहू महाराज चरित्र प्रकाशन समिती यामधील पदांवर होणारा खर्च मागणी क्र.डब्ल्यु-४, २२०५- कला व संस्कृती, ८०० इतर खर्च, (०१) समित्या व समारंभ, (०१)(०१) समित्या व सभारंभ (अनिवार्य) (२२०५ ०४५८) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्र. शासन निर्णय, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क्र., दि.२१/०२/२०२४ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्र. २०२४०३१११८०५१८४२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ASHOK S MANDE

Digitally signed by ASHOK S MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK S MANDE
Date: 2024.03.11 18:14:59 +05'30'

**(अशोक मांडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

३. संचालक,उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,पुणे.
४. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
६. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, सोलापूर,कोल्हापूर,औरंगाबाद, नांदेड, परभणी, बीड, अमरावती, अकोला, बुलढाणा,यवतमाळ, नागपूर,भंडारा, गडचिरोली, रत्नागिरी व रायगड
९. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
१०. प्राचार्य/संचालक, सर्व शासकीय कला, वाणिज्य, विज्ञान, विधी व शिक्षणशास्त्र महाविद्यालये/संस्था.
११. संचालक, सर्व भारतीय प्रशासकीय सेवापूर्व प्रशिक्षण केंद्रे.
१२. वसतिगृह प्रमुख, सर्व शासकीय आर्थिकदृष्टया मागासवर्गीय वसतिगृहे.
१३. अधिक्षक, शासकीय महाविद्यालये वसतिगृहे, मुंबई.
१४. अधिक्षक, सावित्रीदेवी फुले महिला छात्रालय, मुंबई.
१५. अधिक्षक, तेलंग स्तारक मुलींचे वसतिगृह, मुंबई.
१६. सदस्य सचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, महात्मा ज्योतीराव फुले व राजर्षी शाहू महाराज चरित्र प्रकाशन समिती, मुंबई.
१७. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती (मशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.